महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान वितरीत करण्याबाबत.
भोर नगर परिषद, जि. पुणे

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०१८/प्र.क्र.१३/पापु.२२
९ वा मजला, नविन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २० फेब्रुवारी, २०२०

वाचा :

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२.२००८
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९२/पापु-२२, दि.१७.०१.२०१४
४) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे यांचे पत्र क्र.ताशा-२/सुनिअ भोर/२०५/२०१४, दि.१४.०२.२०१४.
५) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२०१८/प्र.क्र.१३/पापु-२२, दि.१८.०४.२०१८
६) मुख्याधिकारी, भोर नगरपरिषद यांचे क्र.भोरनप/पापु/सुनिअ/३११५/२०१८, दि.११.१०.२०१८ चे पत्र.
७) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२०१८/प्र.क्र.१३/पापु-२२, दि.०६.०६.२०१९.
८) मुख्याधिकारी, भोर नगरपरिषद यांचे क्र.भोनप/सुनिअ/५९६/२०१९, दि.२२.७.२०१९ चे पत्र.
९) शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.पुनर्वि-२०२०/प्र.क्र.१८/पापु-४, दि.१४.२.२०२०.

प्रस्तावना :

शासन निर्णय, दि.२२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि.१७.०१.२०१४ अन्वये भोर शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु.७७.१३ लक्ष किंमतीच्या सुधारणा कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्याप्रमाणे सदर योजनेस रु.६९.४२ लक्ष अनुदान अनुज्ञेय असुन भोर नगर परिषदेच्या स्वहिश्श्याची रक्कम रु.७.७१ लक्ष आहे. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा

विभाग, पुणे यांनी संदर्भ क्र.४ अन्वये भोर शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु.७७,१३,८२६/- इतक्या किंमतीच्या सुधारणा कामाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता दिली आहे. भोर नगर परिषदेने स्वहिश्श्याची रक्कम रु.७.१५ लक्ष संबंधित बँक खात्यामध्ये जमा केली असून शासन निर्णय, दि.१८.०४.२०१८ अन्वये रु.४४,६६,४९१/- एवढे अनुदान भोर नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, भोर नगरपरिषद यांनी रु.५४,६५,९६९/- इतक्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असून सदर योजनेंतर्गत उर्वरित अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. मुख्याधिकारी, भोर नगरपरिषद यांनी सादर केलेल्या कामाच्या भौतिक प्रगती अहवालानुसार सदर योजनेचे ९६.६६% काम पुर्ण झाल्याचे तसेच सदर योजनेचे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने पडताळणी केलेल्या अहवालाची प्रत सादर केली आहे. मुख्याधिकारी, भोर नगरपरिषद यांनी दि.१८.०१.२०१८ च्या पत्रान्वये भोर नगरपरिषदेकडे तांत्रिक अधिकारी उपलब्ध असल्याने प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची आवश्यकता नसल्याचे कळविले असून मुख्याधिकारी, भोर नगरपरिषद यांनी दि.२७.१२.२०१८ च्या पत्रान्वये सदर योजनेवर होणाऱ्या खर्चाचे Overall Excess/Saving Statement सादर केले असून त्यामध्ये सदर योजनेवर रु.७५,८३,५६९/- इतका खर्च होणार असल्याचे नमूद केले आहे. सदर खर्चामधून ईटीपी चार्जेस वगळता योजनेची सुधारित किंमत रु.७०,३२,३५५/- इतकी येते. त्याप्रमाणे सदर योजनेस रु.६३,२९,१२०/- (९०%) इतके अनुदान अनुज्ञेय आहे. सदर योजनेस यापुर्वी रु.४४,६६,४९१/- एवढे अनुदान वितरीत करण्यात आले असल्याने वितरीत करावयाच्या शिल्लक अनुदानातून सदर योजनेस उर्वरित रु.१४,६२,६२९/- इतके अनुदान भोर नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नागरी क्षेत्रातील नगरपालिकांच्या ( स्थानिक संस्था ) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान, या कार्यक्रमाखालील महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान योजनांचे कार्यान्वयन पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचेकडून करण्यात येते.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि.१७.०१.२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या भोर शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत कामांकरिता अनुज्ञेय अनुदानापैकी रु.१४,६२,६२९/- (रुपये चौदा लाख बासष्ठ हजार सहाशे एकोणतीस फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार नागरी पाणी पुरवठा योजनांच्या कार्यान्वयनाकरीता सन २०१९-२० या आर्थिक वर्षात, मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता १९२, नगरपरिषदांना सहाय्य (०२) नागरी पाणी पुरवठा व स्वच्छता-(०२) (०२) नगरपालिकांच्या / नगरपरिषदांच्या पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (कार्यक्रम), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर), २२१५१६४७ या कार्यक्रमाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई यांना शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे. वितरीत वाटप खालील

विवरणपत्रामध्ये दर्शविण्यात आले आहे.

(रक्कम रुपयात)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| भोर | ७०,३२,३५५ | ६३,२९,१२० | ७,०३,२३५ | ७,०३,२३५ | ४८,६६,४९१ | १४,६२,६२९ |
| | | | | | **एकूण रुपये** | **१४,६२,६२९** |

- सदर अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत. शासनाच्या निदेशानुसार सदर अनुदान नागरी संस्थांना वितरीत करण्यात यावे.
- अनुदानाची रक्कम ज्याकरीता वितरीत करण्यात आली आहे, त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दि.३१ मार्च, २०२० पर्यंत खर्च करावी.
- या वितरीत अनुदानातून होणा-या वाटपाची माहिती पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने शासनाला कळवावी.
- मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील जोडपत्र-२ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापालांच्या मागणीनुसार प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरीता पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेने महालेखापालांना सादर करावेत.
- पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेला शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झालेली आहेत किंवा जी अनुदाने यापुढील कालावधीत प्राप्त होतील त्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी उपयोगिता प्रमाणपत्रात दर्शविलेल्या वितरीत अनुदानाच्या व खर्चाच्या कार्यक्रमनिहाय रकमा प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात. त्या उपयोगिता प्रमाणपत्रावर सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरी करावी, अशी प्रमाणपत्रे शासनाला स्विकारार्ह होतील.
- सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात शासनाला सादर करावे तसेच उपयोगिता प्रमाणपत्रांच्या प्रती महालेखापालांनाही पाठवाव्यात.
- सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल विहित दिनांकांस, लेखा अधिकारी, पापु-२० पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१ यांच्याकडे सादर करावा.
- या शासन निर्णयान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. हा निधी उपकोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण

अधिकारी म्हणून श्री. आर. के.साकोरे, संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांना तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. म.बा.हजारी, सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांनी या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेली रक्कम उपकोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई यांचे कार्यालयातून आहरित करुन सदर रक्कम ही एनईएफटी (NEFT ) प्रणालीद्वारे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. या वितरीत केलेल्या अनुदानातून होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, १९२, नगरपालिका / नगरपरिषदांना सहाय्य (०२) राज्य योजना-(०२) (०२) नगरपालिकांच्या/नगरपरिषदांच्या पाणीपुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान ( कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर), २२१५१६४७, या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०१९ मधील परिच्छेद ६ व ८ मधील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून सदर नगरपरिषदेस अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय हा वित्तीय अधिकार नियम पुस्तीका,१९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र. ५ परिच्छेद क्रमांक २७ (२) अन्वये विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७/व्यय-३, दि.४.२.२०२० वर दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२००२२०११३४११७०२८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Mahendra Babusing Hajari

Digitally signed by Mahendra Babusing Hajari
DN: c=IN, o=Government of maharashtra, ou=Water supply & Sanitation, postalCode=400032, st=Manipur, 2.5.4.20=2a611aa6775332ae4fb220e8dd3ec11f80d6b95fec14b729156665cff860b06b, cn=Mahendra Babusing Hajari
Date: 2020.02.20 12:39:58 +05'30'

**( म.बा. हजारी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
- महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी.जी.ओ.इमारत, न्यु मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०.
- महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हील लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर- ४४० ००१.
- विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
- महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२. (५ प्रतीसह)
- आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालयालय, सर पोचखानवाला रोड, वरळी, मुंबई-३०.
- जिल्हाधिकारी, पुणे
- नियंत्रक अधिकारी तथा सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
- आहरण व संवितरण अधिकारी तथा संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई- ४०० ६१४. (५ प्रतीसह)
- कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे.
- जिल्हा प्रकल्प अधिकारी ( नगरपालिका ), जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
  मुख्याधिकारी, भोर नगर परिषद, जि. पुणे
- उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई- ४०० ६१४.
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- कक्ष अधिकारी/लेखाधिकारी, पापु-०४, पापु- ०५, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई- ४०० ०३२.
- निवडनस्ती, पापु-२२.